**महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई यांना सन २०२१-२२ या आर्थिक वर्षा करीता अनुदान स्वरुपात अर्थसहाय्य मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय, क्रमांक :- महासंघ- २०२१/प्र.क्र.३१/टेक्स-१ (ब)**

तिसरा मजला (विस्तार इमारत), मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :-९ फेब्रुवारी २०२२.

वाचा :- १. शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सूतगि-२००८/प्र.क्र.१७५/ टेक्स- १(ब), दिनांक २२ जून, २०१०.
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दिनांक १० मे, २०१६.
३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं- २०२१/ प्र.क्र.४८/अर्थ- ३, दि. २४ जून, २०२१.
४. महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई यांचे पत्र क्र. एडिएम / लेखा / अनुदान/ २०२०-२१/११४ , दिनांक १.७.२०२१.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, मुंबई ही वस्त्रोद्योगातील सहकारी संस्थांची प्रतिनिधी संस्था आहे. वस्त्रोद्योग महासंघाची नोंदणी महाराष्ट्र राज्य सहकारी संस्था अधिनियम १९६० मधील तरतुदीनुसार दिनांक २२.१२.१९७० रोजी झालेली आहे. राज्यातील सहकारी सूतगिरण्यांबरोबरच वस्त्रोद्योगातील इतर सहकारी संस्थांना आर्थिक व तांत्रिक मार्गदर्शन करणे तसेच वस्त्रोद्योग संचालनालय व राज्य शासन, वस्त्रोद्योगातील सहकारी संस्था यांच्यामधील दुवा म्हणून काम करणे हे संस्थेचे मुख्य उद्दिष्ट आहे. संदर्भाधीन दिनांक २२ जून, २०१० च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, मुंबई या संस्थेस सन २००९-१० पासून कायमस्वरुपी सरसकट प्रतिवर्षी रु.५०.०० लाख इतके अर्थसहाय्य अनुदान स्वरुपात मंजूर करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्याअनुषंगाने सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात वस्त्रोद्योग महासंघास अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, मुंबई या संस्थेस सन २०२१-२२ मध्ये "मागणी क्रमांक व्ही- २ अंतर्गत, २४२५ - सहकार (००) १०८, इतर सहकारी संस्थांना सहाय्य (०४), सहकारी सूत कताई गिरण्या (०४) (०१), महाराष्ट्र राज्य सहकारी सूतगिरणी महासंघ मर्यादित, मुंबई या संस्थेस व्यवस्थापकीय अर्थसहाय्य (अनिवार्य) (२४२५ ०५९५) ३३- अर्थसहाय्य" या लेखाशीर्षातून रु. १५.००/- लाख (रुपये पंधरा लाख फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद-अ) नुसार खालील बाबींची पूर्तता सदर प्रकरणी होत आहे.

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार :- शासन निर्णय, वित्त विभाग, दि.२४.६.२०२१ नुसार "३३- अर्थसहाय्य " या उद्दीष्टांतर्गत खर्च करण्यास वित्त विभागाची मान्यता घेण्यात आली आहे.

२) मंजूर निधी :- मागणी क्रमांक "व्ही - २ अंतर्गत २४२५ - सहकार, (००) १०८, इतर सहकारी संस्थांना सहाय्य (०४) सहकारी सूत कताई गिरण्या, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना - (०४) (०१) महाराष्ट्र राज्य सहकारी सूत गिरणी महासंघ मर्यादित, मुंबई या संस्थेस व्यवस्थापकीय अर्थसहाय्य (२४२५ ०५९५) ३३, अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षासाठी रु. ५०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित असून वित्त विभागाच्या दि. २४.६.२०२१ च्या शासन निर्णयानुसार ६०% म्हणजे रु.३०.०० लाख इतका निधी खर्च करण्यास परवानगी आहे. या लेखाशीर्षाखालील संपूर्ण निधी अद्याप अखर्चित आहे.

३) मागील **३** महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे :- सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये महाराष्ट्र राज्य सहकारी सूत गिरणी महासंघ मर्यादित, मुंबई या संस्थेस अनुदान म्हणून एकूण रु.५०.०० लाख इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. हा संपूर्ण निधी वस्त्रोद्योग महासंघातील कर्मचा-यांच्या वेतनावर खर्च झाला असल्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यांत येत आहे त्या लेखाशीर्षांतर्गत **१** वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही :- या योजनेखाली १ वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यांत आली आहे :- लागू नाही.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- लागू नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा :- लागू नाही.

८) खरेदी विषयक प्रक्रिया अद्ययावत उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या क्र. भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर,२०१६ च्या शासन निर्णयानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.

३. महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, मुंबई यांना मंजूर करण्यात आलेले अनुदान रु. १५,००,०००/- (रुपये पंधरा लाख फक्त) ही रक्कम " मागणी क्रमांक व्ही - २ अंतर्गत २४२५ - सहकार, (००) १०८, इतर सहकारी संस्थांना सहाय्य (०४) सहकारी सूत कताई गिरण्या, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना-(०४) (०१) महाराष्ट्र राज्य सहकारी सूत गिरणी महासंघ मर्यादित, मुंबई या संस्थेस व्यवस्थापकीय अर्थसहाय्य (अनिवार्य)
२४२५ ०५९५) ३३, अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी व सदर खर्च सन २०२१- २०२२ या आर्थिक वर्षासाठीच्या उपलब्ध तरतुदीमधून भागविण्यात यावा.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अर्थसहाय्य, अनुदान स्वरुपाची रक्कम महाराष्ट्र राज्य वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, मुंबई या संस्थेच्या खाली नमूद करण्यात आलेल्या बँक खात्यावर धनादेशाद्वारे वितरीत करण्यात यावी.

Bank Name : The Saraswat Co-Operative Bank Ltd.
Name of A/C: Maharashtra State Co-Operative Textile Federation Ltd.
IFSC : SRCB 0000023
A/C No. : 023200100006223
Branch Code: 023, Ballard Estate, Mumbai

५. महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघाने या आदेशाद्वारे प्राप्त होणाऱ्या अनुदान स्वरुप रकमेचे विनियोजन प्रमाणपत्र शासनास सादर करावे. तसेच सदरहू रक्कमेचा विनियोग महासंघातील कर्मचाऱ्यांचे वेतन अदा करण्यासाठी करावा.

६. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रु १५,००,०००/- (रु. पंधरा लाख फक्त) ही रक्कम अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या मार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, मुंबई (MAHARASHTRA STATE CO-OPERATIVE TEXTILE FEDERATION LTD., MUMBAI) या संस्थेला अदा करण्यासाठी श्री. सु. पु. पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२ यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व श्री. स. दि. खरात, उपसचिव (सूतगिरणी), (V०००९) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२ यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी महासंघाला मंजूर केलेली रक्कम वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

७. हा शासन निर्णय शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र.सूतगि-२००८/ प्र. क्र.१७५/टेक्स-१(ब), दिनांक २२ जून, २०१० व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५८१/२०२१/व्यय-२ दि. २७.१२.२०२१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२०९१२२२३०९००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Prasenjeet Karlekar

Digitally signed by Prasenjeet Karlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operating Marketing And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d219c43caa42a6d2c11a62256b2ff3ad939a420c9fb6fa0cb24c384214bcee8c, cn=Prasenjeet Karlekar
Date: 2022.02.09 12:34:18 +05'30'

**( प्रसेनजीत कारलेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) आयुक्त, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) प्रादेशिक उपआयुक्त, वस्त्रोद्योग, मुंबई
४) वित्त विभाग (कार्यासन व्यय-२ / अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
५) नियोजन विभाग (का.१४३१), मंत्रालय, मुंबई ४०० ३२
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., वकील हाऊस, दुसरा मजला, १८, श्री. शिवसागर रामगुलाम मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई - ०१.
११) अवर सचिव, १७ -स / कक्ष अधिकारी , १६- स / सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ४००० ०३२.
१२) कार्यासन अधिकारी, रोखशाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) निवड नस्ती, टेक्स-१ (ब)